**श्री.ए.एम.सोनावणे, तत्का. वनक्षेत्रपाल घोडेगांव (वनविभाग जुन्नर) यांचा निलंबन कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०१८/प्र.क्र.६९/फ-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-** १) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) पुणे पत्र क्र. कक्ष-२-क/आस्था/विचौ/२७०८/२०१०-११ दि.११/१०/२०१०.
२) शासन आदेश, म.व व.वि, क्र.एफएसटी-०९/१०/प्र.क्र.३८०/फ-४, दि.०४/०१/२०१२.
३) अ.प्र.मु.व.सं.(कार्मिक), नागपूर यांचे पत्र क्र.विचौ/प्र.क्र.६/(१६-१७)/कक्ष-९/२३२२/ १७-१८, दि.२१/११/२०१७.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक(वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.विचौ/प्र.क्र.६(१६-१७)/कक्ष-९/३२७/१६-१७ दि.४/५/२०१७ व पत्र दि.२७/८/२०१८.

**शासन आदेश :-**

श्री.ए.एम.सोनावणे, तत्का. वनक्षेत्रपाल घोडेगांव (वनविभाग जुन्नर) या पदावर दि.०१/०८/२००९ ते दि.१०/१०/२०१० या कालावधीत कार्यरत असताना त्यांच्याविरुध्द गुन्हा रजि.नं.१०६/२०१० व मुलींचे अनैतिक व्यापार प्रतिबंध कायदा १९५६ चे कलम ३,४,५ प्रमाणे दि.९/८/२०१० रोजी तोफखाना पोलीस स्टेशन अहमदनगर येथे गुन्हा दाखल करण्यात आला होता. त्यास अनुसरुन श्री. सोनावणे, वनक्षेत्रपाल घोडेगांव वन विभाग जुन्नर यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम १० नुसार तरतुदींचा शिस्तभंगांच्या कारवाईस पात्र ठरत असल्याने, मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणे यांनी कार्यालयीन आदेश क्र.कक्ष-२-क/ आस्था/ विचौ/ २७०८/२०१०-११ पुणे दि.११/१०/२०१० अन्वये श्री.ए.एम.सोनावणे यांच्या निलंबनाचे आदेश पारित केले.

**२.** मुख्य वनसंरक्षक (प्रा) पुणे यांनी दि.२२/५/२०११ चे पत्रान्वये श्री.सोनावणे यांचे विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १० अन्वये विभागीय चौकशी सुरु करणेकामी दोषारोप पत्र बजावण्यात आले.

**३.** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दि.२४/५/२०११ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालास अनुसरुन न्यायालयीन निर्णयाच्या अधीन राहून श्री.ए.एम.सोनावणे, वनक्षेत्रपाल (निलंबीत) यांचे निलंबन रद्द करुन त्यांना शासन आदेश, क्र.एफएसटी ०९/१०/प्र.क्र.३८०/फ-४, दि.०४/०१/२०१२ अन्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले.

४. श्री.ए.एम.सोनावणे यांनी दि.९/१/२०१७ अन्वये सादर केलेल्या अभिवेदन विचारात घेऊन , प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) नागपूर यांनी दि.४/०५/२०१७ च्या आदेशान्वये श्री.सोनावणे यांचेविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १० अन्वये सुरू असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणात श्री.सोनावणे यांना ताकीद देऊन सदरचे प्रकरण बंद केले.

५. श्री. ए.एम. सोनावणे, यांच्याविरुध्द तोफखाना पोलीस स्टेशन अहमदनगर येथे दि.९/८/२०१० रोजी नोंदविण्यात आलेल्या येथे गुन्ह्याच्या अनुषंगाने त्यांचे विरुध्द दाखल केलेल्या फौजदारी प्रकरणात मा. न्यायालयीन दंडाधिकारी अहमदनगर यांनी दिलेल्या आदेशाचे अनुषंगाने मा. सत्र न्यायाधीश अहमदनगर यांचेकडे पुर्नविलोकन याचिका क्रं.१००/२०१२ दाखल केली होती. मा. सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांनी दि.२/४/२०१६ चे आदेशान्वये सदर प्रकरणातुन श्री.ए.एम.सोनावणे यांना दोषमुक्त केले आहे.

६. मा. सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांनी दि.२/४/२०१६ च्या आदेशान्वये श्री.ए.एम.सोनावणे यांना दोषमुक्त केले असल्याने म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम ७२ (६) मधील श्री.सोनावणे यांच्या विरुद्ध चालु असलेल्या कारवाईचे पुर्नविलोकन करण्यात आले.

७. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, श्री.सोनावणे, तत्कालीन वनक्षेत्रपाल यांचे निलंबन समर्थनीय ठरत नाही. म्हणुन श्री.सोनावणे, तत्कालीन वनक्षेत्रपाल यांचा निलंबन कालावधी नियमित करण्याबाबत म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ७२ मधील तरतुदीनुसार शासनाने पुढील प्रमाणे आदेश देत आहे:-

**अ)** महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम ७२ (३) मधील तरतुदीनुसार श्री.सोनावणे यांचा दि.११/१०/२०१० ते दि. ११/०१/२०१२ पर्यंतचा निलंबन कालावधी हा सर्व प्रयोजनार्थ कर्तव्यकालावधी म्हणून धरण्यात यावा.

**ब)** उपरोक्त निलंबन कालावधीमध्ये म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम ७२ (४) मधील तरतुदीनुसार, श्री.सोनावणे यांना ते निलंबित झाले नसते तर त्यांना जितके वेतन व भत्ते मिळण्यास ते हक्कदार झाले असते तितके पुर्ण वेतन व भत्ते अदा करण्यात यावेत व यामधुन त्यांना अदा करण्यात आलेला निर्वाह भत्याची रक्कम समायोजित करण्यात यावी.

सदरहू आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. प्ररजा २०१५/प्र.क्र.२५/सेवा-६, दि.२५/०४/२०१७ नुसार प्रत्यायोजित केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१५२२३०१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Niwrutti Dhas

Digitally signed by Anil Niwrutti Dhas
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, serialNumber=f85f1c64c05886c8d514e40d54d27ff3a80ffd907a05433b1c412b7f7ffa0afd, cn=Anil Niwrutti Dhas
Date: 2018.10.29 15:28:36 +05'30'

**( अनिल धस )**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

श्री. ए.एम.सोनावणे, तत्का. वनक्षेत्रपाल घोडेगांव (वनविभाग जुन्नर)
(प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेमार्फत)

**प्रतिलिपी माहितीसाठी व उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
(२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), नागपूर
(४) मुख्य वन संरक्षक (प्रादे.) पुणे / औरंगाबाद.
(५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
(६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
(७) निवड नस्ती, फ-८ कार्यासन.